**<u>नोंदणी पोच देय डाकेने.</u>**

**महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ मधील सहाय्यक कार्यकारी अभियंता या पदावर सरळसेवा भरती.**

महाराष्ट्र शासन.
सार्वजनिक बांधकाम विभाग
**शासन निर्णय क्रमांक- जीएबी-२०१०/प्र.क्र.११२/का.सेवा-२**
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक- १० ऑगस्ट २०१०.

**वाचा** - महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांक -३७४(१)१(१)/२००७/चौदा-ब, दिनांक ८/२/२०१०.

**<u>शासन निर्णय-</u>** महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांनी महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-१, मध्ये खुल्या प्रवर्गातील पदांच्या नेमणूकीसाठी २००७ मध्ये घेतलेल्या स्पर्धात्मक परिक्षेच्या निकालानुसार खाली दर्शविलेल्या उमेदवारांची सहाय्यक कार्यकारी अभियंता, श्रेणी- १, गट -अ, या पदावर महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, गट अ, मध्ये रु-१५६००-५४००- ३९१०० या वेतनश्रेणीमध्ये ते ज्या दिवशी रुजू होतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नेमणूक करण्यात येत आहे. उमेदवारांना देण्यात येत असलेली नियुक्ती त्यांच्या नांवासमोर दर्शविलेल्या गुणानुक्रमांकानुसार करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | प्रवर्ग | गुणानुक्रम २००७. |
|---|---|---|---|
| १ | २. | ३. | ४. |
| १ | श्री. बागडी शिवप्रसाद पुरुषोत्तम | OPEN | 1 |
| २ | श्री. रोकडे संतोष भोलाजी | SC | 2 |
| ३ | श्री. तांबे सिद्धार्थ अशोकराव | OBC | 3 |
| ४. | श्री. मोरे राहुल सुरेश | OPEN | 4 |
| ५. | श्री. बुरुड तुषार अरुण | SC | 5 |
| ६. | श्री. मुळे उत्तमकुमार चंद्रकांत | OBC | 6 |
| ७. | श्रीम.बरमादे मैथिली सुरेश | OPEN | 7 |
| ८. | श्रीम. सोनवणे पल्लवी रमणलाल | OPEN (F) | 8 |
| ९. | श्री. खलाटे प्रशांत कृष्णराव | OPEN(PH) | 26 |
| १० | श्रीम. गाडेकर वृषाली राधाकृष्ण | OBC (F) | 58 |
| ११. | श्रीम. नाग तृप्ती बृजलाल | SC (F) | 66 |
| १२. | श्रीमती. चव्हाण सोनाली रमेश | OPEN (F) | 76 |

२. महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट अ,श्रेणी १, मध्ये वरील प्रमाणे करण्यात आलेली अधिका-यांची नियुक्ती या विभागातील सहाय्यक कार्यकारी अभियंता गट अ, श्रेणी-१, या पदाच्या सेवा भरती नियमातील तरतुदीनुसार सरळसेवा भरतीव्दारे भरण्यासाठी उपलब्ध असलेल्या जागेवर करण्यात येत आहे.

३. सर्वश्री. बागडी शिवप्रसाद पुरुषोत्तम, तांबे सिद्धार्थ अशोकराव, खलाटे प्रशांत कृष्णराव, श्रीम.चव्हाण सोनाली रमेश, हे ४ उमेदवार सद्या सहायक अभियंता श्रेणी-१, या पदावर जलसंपदा विभागा मध्ये कार्यरत आहेत. महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी नाशिक यांचे क्रमांक जा.क्र.अअम/प्रशि/विमूअ/२५२/२०१० दिनांक ०३/०२/२०१० अन्वये सदर अभियंत्यांनी सहायक अभियंता श्रेणी-१, या पदाचे प्रशिक्षण यशस्वीरित्या पूर्ण केले असल्याने त्यांना महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनीतील प्रतिष्ठापन भाग-१ व भाग-२ (८ आठवडे) कालावधीच्या प्रशिक्षणापासून सूट देण्यात येईल. परंतु त्यांना महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक मार्फत सार्वजनिक बांधकाम विभागाकडील ४४ आठवडयांचे क्षेत्रीय प्रशिक्षण घेणे आवश्यक राहिल. त्यांचा परिविक्षाधीन कालावधी २ वर्षाचा राहिल.

४. श्रीमती तृप्ती बृजलाल नाग, ह्या सध्या सार्वजनिक बांधकाम विभागांत सहायक अभियंता श्रेणी-१, गट-अ, या पदावर कार्यरत आहेत. या पदाचे प्रशिक्षण त्यांनी यापुर्वी यशस्वीरित्या पूर्ण केले असल्याने त्यांना प्रशिक्षणापासून सूट देण्यात येईल.

५. सर्वश्री मुळे उत्तमकुमार चंद्रकांत, रोकडे संतोष भोलाजी व श्री. बुरुड तुषार अरुण हे तीन उमेदवार सहायक अभियंता श्रेणी-२, या पदावर जलसंपदा विभागा मध्ये कार्यरत आहेत.

६. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार परिच्छेद क्र.१ मध्ये दर्शविल्याप्रमाणे निवड झालेल्या अधिका-यांची जेष्ठता राहील. त्याचप्रमाणे सामान्य प्रशासन विभाग अधिसुचना क्र. एसआरव्ही- १०७६/ बारा मधील दि.२१/६/१९८२ मधील तरतुदीनुसार राहील.

७. महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली , १९८२ व त्या मध्ये वेळोवेळी करण्यात येणा-या सुधारणांच्या अधीनतेने त्यांची ज्येष्ठता राहील व या नियमावलीतील नियम ४ (२) प्रमाणे या आदेशातील परिच्छेद १४ मध्ये नमूद केलेल्या प्रबोधिनीमध्ये संबंधितांनी दिनांक १/९/२०१० रोजी रुजू व्हावे. ते दिनांक १/९/२०१० रोजी हजर न झाल्यास किंवा काही अपरिहार्य उचित कारणास्तव त्यांना मुदतवाढ हवी असल्यास त्यांनी शासनाकडून मुदतवाढ घेणे आवश्यक असून तशी संमती न घेतल्यास किंवा शासनाकडून त्यांना मुदतवाढ न मिळाल्यास महाराष्ट्र

लोकसेवा आयोगाच्या परीक्षेतील गुणानुक्रमानुसार त्यांना ज्येष्ठता मिळणार नाही व ते हजर होतील त्या दिनांकापासून त्यांची ज्येष्ठता धरण्यात येईल. संबंधित उमेदवारांनी ते रुजू होणार आहेत किंवा नाही ते दिनांक ३०/८/२०१० पूर्वी शासनास कळवावे . त्यांनी दिनांक ३०/८/२०१० पर्यंत काही न कळविल्यास ते इच्छुक नाहीत असे गृहीत धरुन त्यांच्या नियुक्तीचे आदेश रद्द करण्यात येतील.

८. वरील उमेदवारांची महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट अ मधील सार्वजनिक बांधकाम विभागातील नेमणूक बदलण्यात येणार नाही.

९. आवश्यकता भासल्यास वरील उमेदवारांना भारताच्या संरक्षण सेवेतील पदावर किंवा परदेशात प्रशिक्षणाचा कालावधी धरुन ४ वर्षापेक्षा कमी नसणा-या कालावधीसाठी भारत सरकार ठरवील त्या शर्तीवर सेवा करावी लागेल. परंतु

अ) त्यांच्या नियुक्तीनंतर १० वर्षाचा कालावधी संपल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही किंवा

ब) सर्वसाधारणपणे त्यांच्या वयाची ४० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही.

१०. परिविक्षाधीन काळात वरीलपैकी महाराष्ट्र शासनाच्या सेवेत असणा-या उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा वेतन नियमावली १९८१ च्या नियम ११ नुसार निश्चित करण्यात येईल. महाराष्ट्र नागरी सेवा वेतन नियमावली १९८१ च्या नियम ३९.१ मधील पहिल्या परंतुकानुसार त्यांना परिविक्षाधीन काळात वेतनवाढ मिळेल.

११. उपरोक्त उमेदवारांपैकी जी व्यक्ती हिंदी व मराठी भाषा परिक्षा अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सुट मिळाली नसेल, तर हिंदी व मराठी भाषा परिक्षा यासंबंधी केलेल्या नियमानुसार उत्तीर्ण व्हाव्या लागतील..

१२. तसेच उपरोक्त उमेदवारापैकी जी व्यक्ती शासनाने विहीत केलेली संगणक परिक्षा अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल तर शासनाने विहीत केलेली संगणक परिक्षा यासंबंधी असलेल्या नियमानुसार उत्तीर्ण करावी लागेल.

१३. शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्रमांक- जीएबी-१०८१/ ५१४८/ (९६८)/ आ-६ दिनांक १३/४/१९८२ नुसार प्रशिक्षार्थी उमेदवारांना परिविक्षाधीन काळातील प्रथम वर्षात प्रवासभत्ता मिळेल व त्या काळात त्यांचे मुख्यालय नाशिक येथे मुख्य अभियंता व संचालक, महाराष्ट्र प्रशिक्षण प्रबोधीनी, नाशिक यांच्या नियंत्रणाखाली असेल.

१४. वरीलपैकी ज्या उमेदवारांना नंतर सेवेचा राजीनामा द्यावयाचा असेल तर त्यांना शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दिनांक २ डिसेंबर १९९७ मधील तरतुदीनुसार शासनास किमान एक महिन्यांची आगाऊ लेखी सूचना द्यावी लागेल. शासनही वरीलपैकी कोणत्याही उमेदवारांची सेवा समाप्त करावयाची असेल त्यावेळी अशी १ महिन्यांची आगाऊ सूचना त्या उमेदवाराला देईल. तथापि त्यांच्या गैरवर्तणूकीच्या कारणास्तव किंवा त्यांच्या नोकरीच्या किंवा सेवेच्या शर्ती भंग केल्या असतील त्यावेळी त्यांना सूचना न देता सुध्दा त्यांची सेवा शासन समाप्त करु शकेल.

१५. शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक- अंनियो-१००५/१२६/सेवा-४ दिनांक ३१/१०/२००५ मधील तरतूदीनुसार १ नोव्हेंबर २००५ रोजी किंवा त्यानंतर ज्या अधिकारी/कर्मचारी यांची शासकीय सेवेत नियुक्ती होताच त्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल, सध्या अस्तित्वात असलेली निवृत्ती वेतन योजना (म्हणजे महाराष्ट्र नागरीसेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४) आणि सध्या अस्तित्वात असलेली सर्वसाधारण भविष्य निधी योजना लागू ठरणार नाही मात्र उपरोक्त उमेदवारांपैकी जे शासकीय कर्मचारी १ नोव्हेंबर २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असतील त्यांना शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक- अंनियो-१००६/८७/सेवा-४ दिनांक १२ जानेवारी २००७ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील .

१६. संबंधित उमेदवारांनी या शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार ते नियुक्ती स्वीकारण्यास तयार आहेत किंवा कसे याबाबत शासनास दिनांक ३०/८/२०१० पूर्वी कळवावे.

१७. सेवेत दाखल होऊ इच्छिणा-या या प्रशिक्षणार्थी उमेदवारांनी मुख्य अभियंता व संचालक,महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधीनी, नाशिक यांना **दिनांक १ सप्टेंबर २०१० रोजी सकाळी १० वाजता** परस्पर भेटावे व त्यांचेकडून प्रशिक्षणाच्या कार्यक्रमासंबंधी आदेश घ्यावेत.

१८. सेवेत दाखल होणा-या उमेदवारांनी आपले हजर झाल्याचे अहवाल मुख्य अभियंता व संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधीनी नाशिक यांचे मार्फत शासन निर्णय, इमारती व दळणवळण विभाग क्रमांक ०/६८६९/आ(१) दिनांक ३०/५/१९६१ मधील तरतुदीनुसार शासनाला सादर करावेत. अहवालाचा दिनांक हा ते हजर झाल्याचा दिनांक समजण्यांत येईल.

१९. वरीलपैकी जे उमेदवार सेवेत हजर होणार नाहीत त्यांचे बाबतचा ते दाखल झाल्याबद्दलचा अहवाल मुख्य अभियंता व संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधीनी नाशिक यांनी शासनाला पुढील कार्यवाहीसाठी सादर करावा.

२०. संबंधित अधिका-यांनी उमेदवार रुजू झाल्यानंतर त्यांची वैयक्तिक माहिती ( २ प्रतीत)शासन परिपत्रक ज्ञापन, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक - सीआरएफ १२६५/डी-एफ, दिनांक २९/११/१९६५ नुसार शासनाकडे पाठवावी. तसेच फॉर्म क्रमांक पार्ट एक जीईएन २५४ (सी)(आऊटर कव्हर) मध्येही २ प्रतीत माहिती शासनास पाठवावी.

२१. वरील उमेदवार ज्या दिवशी रुजू होतील त्या दिवसापासून नियमाप्रमाणे त्यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यात यावेत व बदली झाल्यास ते संबंधीत अधिका-यांकडे पाठविण्यात यावेत.

२२. मुख्य अभियंता व संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधीनी नाशिक यांनी तसेच संबंधित अधिका-यांनी क्रमांक- एसआरडी-१०६२/डी, दिनांक २६/४/१९६२ मध्ये

विहित केलेल्या नमून्यांत तीन प्रतीमध्ये शासनास पाठवावेत.प्रत्येक उमेदवारांचे सदर अहवाल वेगळे पाठवावेत.

२३. उपरोक्त अधिका-यांच्या गोपनीय अहवालाच्या नस्त्या ते ज्या दिवसापासून सेवेत रुजू होतील त्या दिवसापासून सुरु कराव्यात व बदली झाल्यास संबंधित अधिका-यांकडे पाठवाव्यात.

२४. वरील उमेदवारांपैकी सध्या शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांना पदग्रहण कालावधी अनुज्ञेय राहील. **संबंधित नियंत्रक अधिका-यांनी दिनांक १/९/२०१० रोजी नाशिक येथे मुख्य अभियंता व संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधीनी महाविद्यालय, यांचेकडे हजर होण्याच्या दृष्टीने पुरेसे आधी कार्यमुक्त करावे.**

२५. वरील अधिका-यांनी परिविक्षाधीन कालावधीमध्ये कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विभागीय परिक्षा विहित कालावधीमध्ये उत्तीर्ण न केल्यास आणि अशा त-हेने त्यांचे काम किंवा वर्तणूक योग्य अथवा अनुरुप न आढळल्यास ते सेवेतून कमी करण्यास पात्र ठरतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०१००८१६१७५६०१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( वि.रा.खेडेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

सचिव. महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने ),
सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल- १ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल- १ ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल- २ (लेखापरीक्षा) महराष्ट्र राज्य, नागपूर
महालेखापाल २ ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर,
सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व मुख्य अभियंता,
जलसंपदा विभागातील सर्व मुख्य अभियंता,
मुख्य अभियंता व संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधीनी ,नाशिक,
सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंता,
अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पुल व इमारती), कोकण भवन नवी मुंबई,
मुख्य प्रशासकीय अधिकारी ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. अहमदनगर/सांगली.
अधीक्षक अभियंता,नाशिक/ जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ,धूळे/जळगांव.
अधीक्षक अभियंता व प्रशासक लाभक्षेत्र विकास प्राधिकरण जळगाव.

अधीक्षक अभियंता, माती धरण/ दगडी धरण,/ जलविज्ञान प्रकल्प मंडळ (पृ)
सि.डि.ओ.,मेरी, नाशिक – ४.
जलसंपदा विभागातील सर्व अधीक्षक अभियंता,
अधीक्षक अभियंता, कृष्णा कोयना उपसा सिंचन प्रकल्प मंडळ, सांगली
अधीक्षक अभियंता, पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण मंडळ, सिंचन सेवा भवन नागपूर,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखाधिकारी, मुंबई,
खाजगी सचिव, मा. मंत्री (सा.बां.)
खाजगी सचिव , मा.राज्यमंत्री (सा.बां.)
स्वीय सहाय्यक सचिव (बांधकामे) सार्वजनिक बांधकाम विभाग , मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहाय्यक सचिव (रस्ते) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
कार्यासन-सेवा-१/सेवा-६/आस्था-१/आस्था-२/आस्था-३/आस्था-४/संगणक कक्ष/
प्रशासन-२, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती).

**<u>नोंदणीकृत पोच देय डाकेने.</u>**

| अ.क्र. | उमेदवारांचे नांव व पत्ता | अ.क्र. | उमेदवारांचे नांव व पत्ता |
|---|---|---|---|
| १) | श्री. बागडी शिवप्रसाद पुरुषोत्तम<br>१६ विद्यानगर शेळगी,जनता बँकेशेजारी,<br>सोलापूर. | २) | श्री. रोकडे संतोष भोलाजी<br>द्वारा-टी.बी.कापसे खो.नं.१०.कावसे बिल्डिंग, सिव्हिल लाईन गोंदिया,<br>पिन-४४१६०१ |
| ३) | श्री. तांबे सिद्धार्थ अशोकराव<br>प्रवरा हौ.सो.वॉर्ड-७, पोवता, श्रीरामपूर जिल्हा अहमदनगर. | ४) | श्री. मोरे राहुल सुरेश<br>सुवर्णा गरुड हौ.सो.सिरियल नं ३६/१,प्लॉट नं-४ धनकवडी पूणे-४११०४३. |
| ५) | श्री. बुरुड तुषार अरुण<br>जलतरंग बिल्डिंग जलशुद्धिकरण केंद्र, शिवाजी रोड. मिरज,जि.सांगली-४१६४१०. | ६) | श्री. मुळे उत्तमकुमार चंद्रकांत<br>१५५४/गणेश नगर रोड क्र.२, सिव्हिल हॉस्पिटलसमोर, सांगली. ४१६४१६. ता. मिरज. जिल्हा सांगली. |
| ७) | श्रीम.बरमादे मैथिली सुरेश<br>,प्लॉट नं-१४, सुयोग हाईट,स्नेह पॅराडाईज कॉलनीजवळ, एम.आय.टि. कॉलेज पौड रोड कोथरुड, पूणे-४११०३८. | ८) | श्रीम. सोनवणे पल्लवी रमणलाल<br>सौभाग्य रेसिडेन्सी, फ्लॅट नं. ३,सेक्टर-१६, प्लॉट नं.८२, राजे शिवाजी नगर, बेन्झ रोड, चिखली-प्राधिकरण, चिंचवड,पुणे-१९. |
| ९) | श्री. खलाटे प्रशांत कृष्णराव<br>द्वारा-श्री.नानासाहेब खरडे,फ्लॅट नं.३, रुही-१,तारवाला नगर दिंडोरी रोड, नाशिक. | १०) | श्रीम. गाडेकर वृषाली राधाकृष्ण<br>४६१०, श्रीराम निवास कमल नगर,हिरावाडी, पंचवटी,नाशिक.४२२००३. |
| ११) | श्रीमती. चव्हाण सोनाली रमेश<br>मध्यम प्रकल्प उप विभाग, हिंगणघाट, ता. हिंगणघाट जि. वर्धा. | | |